**मौ.गंगाचिचोंली ता.अंबड जि.जालना या पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास व आराखडयास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२०१२/प्र.क्र. २६९/पापु-१८.**
नवीन प्रशासन भवन
मंत्रालय, मंबई ४०० ०३२
दिनांक: १२ जानेवारी, २०१५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ववेका-१०९७/प्र.क्र.४३७/अ/पापु-१० दिनांक ४ फेब्रुवारी,१९९८.
२) शासन पत्र पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.बैठक-२०१२/प्र.क्र.१२२/पापु-०६ दि.३१.८.२०१२.

**प्रस्तावना :-**

मौ.गंगाचिचोंली ता.अंबड जि.जालना या पाणी पुरवठा योजनेच्या रु. २९.३६ लक्ष रक्कमेच्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास वर नमूद केलेल्या दिनांक ०४.०२.१९९८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, काही अपरिहार्य कारणामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली. सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याच्या हेतूने स्थापन करण्यात आलेल्या वित्त विभाग, नियोजन विभाग, व या विभागातील आणि क्षेत्रिय स्तरावरील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिका-यांच्या छोटया गटाने दिनांक २९ ऑगस्ट,२०१२ रोजीच्या बैठकीत सदर योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची शिफारस केली. त्याअनुषंगाने अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ना.व.ग्रा. योजना मंडळ, लातूर यांच्याकडून प्राप्त झालेल्या मौ.गंगाचिचोंली ता.अंबड जि.जालना या पाणी पुरवठा योजनेला सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेच्या अनुषंगाने मौ.गंगाचिचोंली ता.अंबड जि.जालना या पाणी पुरवठा योजनेच्या रु. ४६.३७ ( रु. सेहचाळीस लक्ष सदोतीस हजार ) किंमतीच्या सुधारीत अंदाजपत्रकास व आराखडयास खालील अटींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.
२) या योजनेच्या मुळ प्रशासकीय मंजूरीच्या शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्यांचेही पालन करण्यात यावे.
३) ही योजना मौ. गंगाचिचोंली गावाची असल्याने ती सर्व कामे पुर्ण करुन सबंधित ग्रामपंचायतीस या वित्तीय वर्षात हस्तांतरीत करण्यात यावी, व सदर योजना पुनर्सुधारीत करण्यात येणार नाही.

४) ही योजना राबविणे, त्यांचे परिरक्षण दुरुस्त्या ( विशेष दुरुस्त्या धरुन ) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवीकरण निधीसाठी किंवा योजनेच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम १९६० मधील तरतुदीनुसार आकारता येणा-या पाणी पट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल असे बघण्याची जबाबदारी सबंधीत ग्रामपंचायतीची/जिल्हापरिषदेची राहील. त्यानुसार या योजनेसाठी पाणीपट्टीचा दर आकारण्यात यावा. याप्रमाणे दर आकारणी करुनही योजना आर्थिकदृष्टया स्वयंपुर्ण झाली नाही. तर देखभाल दुरुस्तीचा जादा खर्च ग्रामपंचायतीस/जिल्हापरिषदेस त्यांच्या इतर उत्पन्नातून भागवावा लागेल. तसेच सदर योजनेच्या कामाचा पुर्णत्वाचा दाखला त्वरीत सादर करण्यात यावा.

५) सदर गावात जिल्हापरिषदेमार्फत कोणतीही वेगळी योजना राबविण्यात येत नाही याची अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी खात्री करावी.

२. या योजनेवर होणारा खर्च जिल्हापरिषदेला राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत प्राप्त होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय संदर्भ क्र. २४९/ व्यय-३, दिनांक २८.३.२०१४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०११२१५४५४०५८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHADGE RAMDAS M

Digitally signed by GHADGE RAMDAS M
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=Maharashtra, cn=GHADGE RAMDAS M
Date: 2015.01.12 15:55:20 +05'30'

( रा. म. घाडगे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
२) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई.
३) जिल्हाधिकारी, जालना..
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.जालना.
५) मुख्य अभियंता. म.जी.प्रा. ठाणे.
६) अधीक्षक अभियंता म.जी.प्रा. नागरी व ग्रामीण योजना मंडळ, औरंगाबाद.
७) कार्यकारी अभियंता. म.जी.प्रा. नागरी व ग्रामीण योजना विभाग, जालना.

८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जि.प. जालना
९) संचालक भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१०) उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा औरंगाबाद विभाग,औरंगाबाद.
११) नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई.
१२) वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
१३) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
१४) महालेखापाल, (लेखा व परिक्षण ) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
१५) वरिष्ठ भूवैज्ञानिक, भुजल सवेक्षण व विकास यंत्रणा, जालना.
१६) निवडनस्ती, पापु-१८.